# महाराष्ट्र शासन

गृह विभाग

शासन आदेश क्रमांक- आयपीएस-१७०९ / प्र.क्र. ३४२ / पोल १,

मंत्रालय, दिनांक २८ ऑगस्ट, २००९.

**शासन आदेश :-**

राज्यातील कायदा व सुव्यवस्था व्यवस्थित राखण्याच्या दृष्टीने प्रशासकीय निकड विचारात घेऊन, महाराष्ट्र शासकीय कर्मचाऱ्यांच्या बदल्यांचे विनियमन आणि शासकीय कर्तव्ये पार पाडताना होणाऱ्या विलंबास प्रतिबंध अधिनियम, २००५, कलम ४ (४) व ४(५) मधील तरतूदींच्या अनुषंगाने, सक्षम प्राधिकारी यांच्या पुर्व मान्यतेने, भारतीय पोलीस सेवेतील पोलीस उपमहानिरीक्षक/अपर पोलीस आयुक्त दर्जाच्या खालील अधिकाऱ्याच्या त्यांच्या नावासमोर दर्शविण्यात आलेल्या पदावर पदोन्नतीने / बदलीने नियुक्त्या करण्यात येत आहेत:-

| अ.क्र. | अधिका-याचे नाव व सध्याची नियुक्ती | नवीन नियुक्तीचे पद व ठिकाण |
|---|---|---|
| १ | श्री.अमितेश कुमार, भापोसे,<br>पोलीस अधीक्षक, औरंगाबाद (ग्रामीण) | पोलीस आयुक्त, अमरावती शहर<br>**(पदोन्नतीने)** |
| २ | श्री.निकेत कौशिक, भापोसे,<br>पोलीस उपायुक्त, परिमंडळ-९, बृहन्मुंबई | पोलीस उप महानिरीक्षक, अॅन्टी करप्शन ब्युरो, मुंबई<br>**(पदोन्नतीने)** (रिक्त पदावर) |
| ३ | श्री.एस.के. तरवडे, भापोसे,<br>सहाय्यक पोलीस महानिरीक्षक (तरतूद),<br>महाराष्ट्र राज्य, मुंबई | पोलीस उपमहानिरीक्षक, आर्थिक गुन्हे शाखा,<br>राज्य गुन्हे अन्वेषण विभाग, महाराष्ट्र राज्य, पुणे<br>**(पदोन्नतीने)** (रिक्त पदावर) |
| ४ | श्री.ए.डी.शिंदे, भापोसे,<br>समादेशक, राज्य राखीव पोलीस बल,<br>गट क्रमांक-८, मुंबई | अपर पोलीस आयुक्त, गुन्हे, पुणे शहर<br>**(पदोन्नतीने)** (रिक्त पदावर) |
| ५ | श्री.आर.जी.कदम, भापोसे,<br>पोलीस अधीक्षक, पुणे (ग्रामीण) | पोलीस उपमहानिरीक्षक<br>**(पदोन्नतीने)** |
| ६ | श्री.डी.जी.श्रीराव,भापोसे,<br>पोलीस उपआयुक्त, दहशतवाद विरोधी पथक,<br>मुंबई | पोलीस उपमहानिरीक्षक (तरतूद),<br>महाराष्ट्र राज्य, मुंबई<br>**(पदोन्नतीने)** (श्रेणीवाढ पदावर) |
| ७ | श्री.जगन नाथ, भापोसे<br>पोलीस आयुक्त, अमरावती शहर | कारागृह उपमहानिरीक्षक, औरंगाबाद |
| ८ | श्री.एस.के.वर्मा, भापोसे<br>कारागृह उपमहानिरीक्षक, औरंगाबाद | अपर पोलीस आयुक्त, ठाणे शहर<br>(रिक्त पदावर) |
| ९ | श्री.ए. एस.पाटील, भापोसे<br>कारागृह उपमहानिरीक्षक, पुणे | पोलीस उपमहानिरीक्षक,<br>बिनतारी संदेश, महाराष्ट्र राज्य, पुणे.<br>(रिक्त पदावर) |
| १० | श्री.आर.के.पदमनाभन, भापोसे,<br>पोलीस उप महानिरीक्षक,<br>(केंद्रिय प्रतिनियुक्तीवरुन परत) | अपर पोलीस आयुक्त,<br>दक्षिण प्रादेशिक विभाग बृहन्मुंबई<br>(रिक्त पदावर) |
| ११ | श्री. आर.ई.पवार, भापोसे<br>अपर पोलीस आयुक्त, सशस्त्र दल, बृहन्मुंबई | अपर पोलीस आयुक्त,<br>उत्तर प्रादेशिक विभाग, बृहन्मुंबई<br>(रिक्त पदावर) |

२.  उपरोक्त अ.क्र.-५ येथील श्री.आर.जी.कदम,भापोसे यांच्या पदोन्नतीनंतरच्या पदस्थापने बाबतचे आदेश स्वतंत्रपणे निर्गमित करण्यात येत आहेत.

३.  उपरोक्त नमूद अधिकाऱ्यांना सध्याच्या पदावरुन तातडीने कार्यमुक्त करुन त्यांच्या नवीन नियुक्तीच्या पदावर रुजू होण्यासाठी, महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई यांनी आवश्यक ती कार्यवाही तात्काळ करावी.

४.  उपरोक्त अधिका-यांच्या सध्याच्या पदस्थापनेबाबत अथवा नविन नियुक्तीच्या ठिकाणाबाबत मा.न्यायालयाचे किंवा न्यायाधिकरणाचे काही आदेश असल्यास ते विचारात घेऊन पुढील कार्यवाही करण्यात यावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

**( सु. ज. महाजन )**
**सह सचिव, महाराष्ट्र शासन, गृह विभाग.**

**प्रति,**

महासंचालक व पोलीस महानिरीक्षक, महाराष्ट्र राज्य, मुंबई

**प्रत माहितीसाठी सादर :-**

- महालेखापाल-१/२, लेखा व अनुज्ञेयता/लेखा परीक्षा, महाराष्ट्र राज्य, मुंबई/नागपूर.
- मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
- मा.उप मुख्यमंत्री यांचे सचिव
- मुख्य सचिव यांचे सचिव.
- मा.मंत्री (गृह) यांचे खाजगी सचिव
- मा.राज्यमंत्री (गृह) (शहरे) यांचे खाजगी सचिव
- मा.राज्यमंत्री (गृह) (ग्रामीण) यांचे खाजगी सचिव
- अधिदान व लेखा अधिकारी/निवासी लेखा अधिकारी, मुंबई
- संबंधित जिल्हा कोषागार अधिकारी
- अपर मुख्य सचिव (गृह) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक
- प्रधान सचिव (विशेष) यांचे वरिष्ठ स्वीय सहायक.
- प्रधान सचिव (अ. व सु.), यांचे स्वीय सहायक.
- लेखा अधिकारी, भापोसे कक्ष, गृह विभाग, मंत्रालय, मुंबई
- निवडनस्ती (पोल-१)